**महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास मदत वाहिनी (हेल्पलाईन) या योजनेकरीता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील उपलब्ध निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:-राअआ २०२४ / प्र.क्र.७३ / का-९,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १५ मे, २०२४.

**वाचा:-** (१) शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र.अविवि २००९/प्र.क्र.५७/०९/का-१ दि.५ फेब्रुवारी,२००९.

(२) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र अर्थसं २०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३ दि.१ एप्रिल, २०२४.

(३) महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाचे पत्र क्र.राअआ/संकिर्ण/प्र.क्र.१६६/२०२४/का-३ दि.०३.०४.२०२४.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयामध्ये अल्पसंख्याक समुदायातील लोकांना शासकीय कामकाजाबाबत वेळोवेळी उद्भवणाऱ्या अडचणीबाबत मार्गदर्शन करण्यासाठी व शासनाने अल्पसंख्याक समाजासाठी सुरु केलेल्या विविध योजनांबाबत लोकांच्या शंकाचे निरसन करण्यासाठी महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाच्या कार्यालयात एक हेल्पलाईन सुविधा योजना कार्यान्वित करण्यात आली आहे. या योजनेच्या अंमलबजावणीसाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात सदर योजनेंतर्गत बीम्स प्रणालीवरील उपलब्ध निधीमधून अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण २००, इतर कार्यक्रम राज्य योजनांतर्गत योजना (०१) अल्पसंख्याकांना सहायक, (०१) (११) मदत वाहीनीकरीता सहायक अनुदान (२२३५ ए १७८) (कार्यक्रमावरील खर्च), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशीर्षांतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता संदर्भ क्र.२ येथील वित्त विभाग शासन परिपत्रक दिनांक १ एप्रिल, २०२४ मधील मार्गदर्शक सुचनांनुसार सद्यस्थितीमध्ये एकूण रू.४,९०,०००/- इतका निधी लेखानुदानाद्वारे बीम्स प्रणालीवर उपलब्ध करून दिलेला आहे.

२. संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये, सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग यांनी हेल्पलाईन योजनेकरीता निधी वितरणाची मागणी केलेली आहे. त्यास अनुसरुन या योजनेकरीता वित्त विभागाने उपलब्ध करून दिलेले रु.४,९०,०००/-(अक्षरी रूपये चार लक्ष नव्वद हजार फक्त) एवढे अनुदान मंजूर करुन महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर तरतूद सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. याकरिता सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई हे नियंत्रक अधिकारी तर अवर सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने सन २०२४-२५ च्या मासिक निधी विवरण पत्रात दर्शविल्याप्रमाणे आपल्या कार्यालयाचा खर्च विहित मर्यादेपर्यंतच करावा. या आदेशान्वये वितरित करण्यात आलेल्या रकमेतून केलेल्या खर्चाचा तपशील, उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) तसेच संदर्भ क्र.२ शासन परिपत्रक, वित्त विभाग अन्वये विहीत अटी व तरतुदींचे पालन महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने करावे.तसेच सदर वितरीत निधी बाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केल्याशिवाय पुढील अनुदान वितरीत केले जाणार नाही.

४. उपरोक्त रक्कम "मागणी क्रमांक झेडई-१, मुख्य लेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम , राज्य योजनांतर्गत योजना (०१) अल्पसंख्याकांना सहाय (०१) (११) मदत सेवेकरीता सहायक अनुदान २२३५ ए १७८ (कार्यक्रमावरील खर्च), ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर)" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून खर्ची टाकण्यात यावी.

५. "सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२४ / प्र.क्र.३४ / अर्थ-३, दिनांक १ एप्रिल, २०२४ मधील परिच्छेद व त्यासोबतच्या परिशिष्टांमधील अटींची पुर्तता होत असून त्यास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. "

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०५१५१७२३१४४६१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASHANT DADASAHEB ANDHARE

Digitally signed by PRASHANT DADASAHEB ANDHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=07a98306254b29e5139aab4819df96eb16b0b66a000c20ad72f67a4639fd58ca, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7B06EE8A2C581E72F4DCE6564DC954B5C81A4E8EA299DAB1B3C26C0374583EB0, cn=PRASHANT DADASAHEB ANDHARE
Date: 2024.05.15 17:37:03 +05'30'

**( प्र. दा. अंधारे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,

२) मा.मुख्यमंत्र्यांचे अ.मु. सचिव,

३) मा.मंत्री / मा.राज्यमंत्री (अविवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

४) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
५) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
६) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
७) संचालक, लेखा व कोषागारे
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१०) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
११) सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई,
१२) कक्ष अधिकारी (का. ७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३) निवडनस्ती (कार्यासन-९).